राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई येथील प्रबंधक (प्रशासन)गट-अ (राजपत्रित) पदावर तात्पुरती पदोन्नती देण्याबाबत.



**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक -ग्रासंअ-०४२४/प्र. क्र. ३९/ग्रासं-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - ०३ एप्रिल, २०२५.

**शासन निर्णयः-**

अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या अधिपत्याखालील राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोगातील सन २०२३-२४ या निवडसूची वर्षात प्रबंधक, गट-ब (राजपत्रित) (वेतनश्रेणी एस-१५ रु.४१८००-१३२३००) या संवर्गातून प्रबंधक (प्रशासन) गट-अ (राजपत्रित) (वेतनश्रेणी एस-२० : ५६१००-१७७५००)या पदावर या आदेशाद्वारे विहित अटींच्या अधिनतेने निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात पदोन्नती देण्यात येत असून, त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ -३ मध्ये दर्शविण्यात आलेल्या ठिकाणी या आदेशाच्या दिनांकापासून करण्यात येत आहे.

| अ. क्र | अधिकाऱ्यांचे नाव | नागरी सेवा मंडळाची शिफारस |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १. | श्रीमती अंजली अ. गावडे | प्रबंधक (प्रशासन), राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग,मुंबई |

२. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.०४.०८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयान्वये पदोन्नतीमधील आरक्षण अवैध ठरविले आहे. मा.उच्च न्यायालयाच्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा. सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ दाखल केली आहे. सदर याचिका अद्याप प्रलंबित आहे. त्यानुसार मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधीन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि. २५.०५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबत सामान्य प्रशासन विभाग / १६-ब कार्यासनाच्या दि. ०७.०५.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या सूचनांनुसार सदर पदोन्नती देण्यात येत आहे.

१) सदरची पदोन्नती ही प्रशासकीय निकड म्हणून तात्पुरती पदोन्नती राहील.

२) सदर पदोन्नती, सद्य:स्थितीत प्रबंधक, गट-ब (राजपत्रित) राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग या पदाच्या ज्येष्ठता यादीबाबत कोणतेही न्यायालयीन प्रकरण प्रलंबित नाही, तसेच या ज्येष्ठता यादीस आव्हानित देखील करण्यात आलेले नाही ही वस्तुस्थिती विचारात घेऊन केवळ तात्पुरत्या स्वरूपात देण्यात येत असून सदर पदावर संबंधीत अधिकाऱ्यांचा कायमस्वरूपी धारणाधिकार राहणार नाही.

३) सन २०२३-२४ या निवडसूची वर्षाकरीता पात्र प्रबंधक, गट-ब (राजपत्रित) यांची प्रबंधक (प्रशासन) गट-अ (राजपत्रित), राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग पदावरील पदोन्नती तात्पुरती असल्याने निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमित पदाचा व सेवा ज्येष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

४) सदर पदोन्नत्या तात्पुरत्या स्वरूपाच्या असून त्या केवळ पदोन्नत कोट्यात उपलब्ध होणाऱ्या पदांनुसार नियमित करण्यात येतील.

५) पदोन्नत होणाऱ्या अधिकारी पदस्थापनेच्या पदावर तात्काळ रूजू न झाल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१५/ प्र.क्र.३०३/ का.१२, दि.१२.०९.२०१६ अन्वये कार्यवाही करण्यात येईल.

६) सदर पदोन्नती ही संबंधित अधिकाऱ्यांविरूध्द प्रस्तुत आदेशाच्या दिनांकापर्यंत कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी सुरू झालेली नाही वा प्रस्तावित नाही या धारणेच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

७) हे आदेश तात्काळ अंमलात येतील. प्रबंधक, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग यांनी संबंधित अधिकारी यांना पदोन्नतीच्या पदावर रुजू होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करावे व पदोन्नतीच्या पदावर रुजू करुन घेवून त्याबाबतचा रुजू अहवाल cp4.mhpds.gov.in या ई-मेलवर शासनास पाठवावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२५०४०३१६११२०६००६ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GAJANAN RAMDAS DESHMUKH

Digitally signed by GAJANAN RAMDAS DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=09c74e56a555b1257e71176f4c700164528f1b5b3ff73c027668f5ff29c069da, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DEE8A196FB0BB879933A88F87075CC443D363994879D49E0C1BA541465369700, cn=GAJANAN RAMDAS DESHMUKH
Date: 2025.04.03 16:12:37 +05'30'

**(गजानन रा. देशमुख)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्रीमती अंजली अं. गावडे (राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई यांच्यामार्फत)

**प्रत :-**

१. मा. उप मुख्यमंत्री तथा मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा. राज्य मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अध्यक्ष, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई.
४. सचिव (अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
५. प्रबंधक (प्रशासन/विधी) राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई.
६. महालेखापाल -१( लेखा परिक्षा )/( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. महालेखापाल -२ ( लेखा परिक्षा)/( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, नवी मुंबई.
१०.सर्व प्रबंधक, जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोग.
११. उप सचिव (ग्रासं-४), अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती, कार्यासन ग्रासं-४.